**मौजे करोडी, ता.जि.छत्रपती संभाजीनगर येथील गट नं.२४ मधील ६ हे ०० आर (१५ एकर) सरकारी गायरान जमीन ESIC Hospital करिता (२०० खाटांचे विमा कामगार रुग्णालय) उभारणीसाठी कर्मचारी राज्य बीमा निगम, श्रम व रोजगार मंत्रालय,भारत सरकार यांना महसूल मुक्त व सारा माफीने प्रदान करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक जमीन २०२४/प्र.क्र.२७/ज-७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: १० जून, २०२५

वाचा :-
१. विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र क्र.२०२४/मशाका/जमीन-१/कावि-०९, दि.५.१.२०२४,दि.८.१.२०२५, दि.३.४.२०२५,दि ७.४.२०२५
२. शासन पत्र समक्रमांक दि.१३.०१.२०२५
३. कर्मचारी राज्य बिमा निगम यांचे पत्र क्र.३१-M-Waluj Hospital/Co-Ordn/२०२२, दि.२४.०१.२०२५ व २.४.२०२५
४. सह जिल्हा निबंधक, छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र क्र.सजिनि/छसन/मूल्यांकन/२०२३/४२८८/२०२३, दि.२८.१२.२०२३
५. शासन अधिसूचना, महसूल व वन विभाग क्र.जमीन २०१५/प्र.क्र.५५/ज-१, दि.३१.१२.२०१५
६. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.जमीन २०१८/प्र.क्र.३८/ज-१, दि.२५.०७.२०१९
७. महसूल व वन विभाग ,कार्यालयीन आदेश क्र.संकिर्ण २०२१/प्र.क्र.१४९/ई, दि.२२.०७.२०२१
८. वित्त विभाग, शा विअप्र.क्र.नि.२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनीयम, दि.०८.०८.२०१९
९. शासन परिपत्रक, महसूल व वन वि.क्र.LND १०८३/२७०२/CR १९०९-GS दि.०४.०२.१९८३

**प्रस्तावना:-**

छत्रपती संभाजीनगर हे देशातील एक महत्त्वाचे औद्योगिक केंद्र असून, शेंद्रा, बिडकीन,डिमआयसी वाळुज, चिकलठाणा, रेल्वे स्टेशन या औद्योगिक वसाहतीमध्ये कामगार वर्गाची वाढती लोकसंख्या लक्षात घेता, कर्मचारी राज्य बीमा निगम या केंद्र शासनाच्या श्रम व रोजगार मंत्रालयाच्या अधिनस्त वैधानिक प्राधिकरणाने वैद्यकीय सेवा व सुविधा उपलब्ध करुन देण्याकरिता सार्वजनिक प्रयोजनार्थ २०० खाटांचे रुग्णालय उभारण्याचा प्रस्ताव विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर यांचेमार्फत शासनास प्राप्त झाला आहे.

वैद्यकीय महाविद्यालय स्थापना करणे हे निश्चितच सार्वजनिक प्रयोजनाचे व सार्वजनिक हिताचे असल्यामुळे महाराष्ट्र जमीन महसूल संहिता नियम, १९६६ च्या नियम २२ (अ) च्या पोटनियम (२) आणि महाराष्ट्र जमीन महसूल ( सरकारी जमिनीची विल्हेवाट करणे ) नियम १९७१ मधील नियम ६ पोट नियम ३(क) मधील तरतूदीनुसार तसेच महसूल व वन विभाग, शासन अधिसूचना दिनांक ३१.१२.२०१५ नुसार, महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमीनीची विल्हेवाट करणे (व्दितीय सुधारणा) नियम २०१५ अन्वये,

महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमीनीची विल्हेवाट करणे) नियम १९७१ मधील नियम ६ मध्ये पोटनियम ३ नुसार मौजे करोडी, ता.जि.छत्रपती संभाजीनगर येथील गट नं.२४ मधील ६ हे ०० आर (१५ एकर) सरकारी गायरान जमीन ESIC Hospital करिता (२०० खाटांचे विमा कामगार रुग्णालय) उभारणीसाठी सार्वजनिक आरोग्य विभागाच्या प्रशासकीय मान्यतेनंतर कर्मचारी राज्य बीमा निगम, श्रम व रोजगार मंत्रालय,भारत सरकार यांना महसूल मुक्त व सारा माफीने प्रदान करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहेत.

<u>अटी व शर्ती:-</u>

१. सदर जमीन सार्वजनिक आरोग्य विभाग "भोगवटादार वर्ग-२" म्हणून धारण करतील.

२. सदर शासकीय जमीनीचा वापर जमीन ESIC Hospital करिता (२०० खाटांचे विमा कामगार रुग्णालय) उभारण्याच्या प्रयोजनासाठीच राहील.

३. सदर जमीन सार्वजनिक आरोग्य विभागाच्या प्रशासकीय मान्यतेच्या अधीन राहून प्रदान करण्यात येत आहे.

४. उपरोक्त नमूद जमीनीचा वापर मंजूर प्रयोजनाच्या मर्यादेत राहील. सदर जमीन किंवा तिचा कोणताही भाग किंवा तिच्यातील कोणतेही हितसंबंध विक्री/देणगी देऊन/अदला बदल करुन/गहाण ठेऊन/पट्टयाने देऊन/खाजगी-सार्वजनिक सहभाग तत्वावर किंवा बाह्य यंत्रणाद्वारे किंवा अन्य कोणत्याही प्रकारे हस्तांतरण अनुज्ञेय राहणार नाही.

५. विषयांकित शासकीय जमिनीचा वापर केवळ मंजूर प्रयोजनासाठी होईल तसेच अन्य कोणत्याही प्रयोजनासाठी सदर जमिनीचा अथवा त्याच्या कोणत्याही भागाचा तात्पुरता अथवा कायमस्वरुपी वापर होणार नाही याबाबत योग्य ती दक्षता घेण्यात यावी .

६. विषयांकीत जागेची मोजणी प्रतिग्रहिता स्थानिक स्वराज्य संस्थेने संबंधित उप अधीक्षक, भूमी अभिलेख यांचेकडून करुन घेणे बंधनकारक राहील

७. सदर जमिनीचा ताबा मिळाल्यापासून ३ वर्षांच्या आत मंजूर प्रयोजनासाठी वापर सुरु करणे बंधनकारक राहील.

८. भविष्यामध्ये सदर शासकीय जमीन शासनास अथवा शासनाच्या नामनिर्देशित कोणत्याही शासकीय यंत्रणांना, कोणत्याही सार्वजनिक प्रयोजनार्थ अथवा सार्वजनिक प्रकल्पाकरिता आवश्यक असल्यास असेल तर ती विहित कार्यपध्दतीनुसार परत घेण्याची मुभा शासन/जिल्हाधिकारी यांना राहील.

९. सदर जमीनीबाबत शासन निर्णय, महसूल व वन विभाग दि.१२.०७.२०११ मधील कोणत्याही तरतुदींचे उल्लंघन होत नाही याबाबत जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजीनगर यांनी योग्य ती खातरजमा करण्याची जबाबदारी संयुक्तपणे राहील.

१०. सदर जमीनीबाबत शासन निर्णय, महसूल व वन विभाग दि.०४.०२.१९८३ मधील तरतुदी लागू राहतील.

११. जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजीनगर यांना स्थिती-कालानुरूप आवश्यक वाटतील अशा अन्य अटी व शर्ती विहित करण्याची मुभा राहील.

१२. वरील अटी/शर्तीपैकी कोणत्याही अटी/शर्तीचा भंग झाल्यास विहित कार्यपध्दतीनुसार शर्तभंगाबाबत सदर जमीन शासन जमा करण्याचा अधिकार शासनास राहील.

सदर शासन निर्णय मंत्रिमंडळाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत असून महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०६१०१८२६५१६०१९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANISHA K JAYBHAYE

Digitally signed by MANISHA K JAYBHAYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=01343097b2445ecf81676f921be86528e4e82e29792fd17cca89302f5fd01ef6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3B4284299520D55C5401385D853BB77E465E2E417BCFDDF3EBB6235BB48DEEFA, cn=MANISHA K JAYBHAYE
Date: 2025.06.10 18:28:19 +05'30'

**( मनिषा जायभाये )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजी नगर
२. जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजी नगर
३. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,मुंबई
४. जमाबंदी आयुक्त व संचालक,भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. सस (व्यय-९), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
६. सह सचिव (राकावि ), सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,मुंबई
७. सह जिल्हा निबंधक, छत्रपती संभाजीनगर
८. महालेखापाल लेखा व अनुज्ञेयता २ महाराष्ट्र राज्य, नागपूर
९. उपविभागीय अधिकारी/अपर तहसिलदार, छत्रपती संभाजीनगर , जिल्हा छत्रपती संभाजी नगर
१०. निवडनस्ती (कार्यासन ज-७)